तात्काळ

क्रमांक:सीडीआर-१०९६/८७/प्र.क्र. ७/९६/११,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ११.६.१९९७.

प्रति,

सचिव [आस्थापना],
सर्व मंत्रालयीन विभाग.

विषय:- अखिल भारतीय सेवेतील,राज्य सेवेतील तसेच सार्वजनिक उपक्रम,मंडळे,महामंडळे इत्यादींचे पदाधिकारी यांचे परदेश दौरे.

संदर्भ : शासन परिपत्रक समक्रमांक दिनांक ६.४.९६

संदर्भाधिन परिपत्रकान्वये विभागांनी परदेश दौ-याच्या प्रस्तावाची छाननी करुन असे प्रस्ताव शिफारस समितीकडे पाठविताना संदर्भाधिन परिपत्रकासोबत जोडलेल्या तपासणी सूचितील माहितीसह सादर करण्यात यावे असे सूचित केले आहे. आता असे सुचित करण्यात येते की,दिनांक ६.४.९६ च्या शासन परिपत्रकाप्रमाणे परदेश दौ-याचे प्रस्ताव सामान्य प्रशासन विभाग व मुख्य सचिवांना सादर करताना सोबतच्या नविन तपासणी सूचिप्रमाणे सहा प्रतीत सादर करण्यात यावे.

आपला,

[ रा.द.कोसारे ]
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत माहितीसाठी सादर -

सह सचिव,सामान्य प्रशासन विभाग,कार्यासन क्रमांक १० व १२-अ.

## तपासणी सूची

### विदेशात प्रशिक्षण/दौ-याच्या प्रस्तावाची छाननी करताना तपासावयाचे मुद्दे

१] दौ-यावर जाणा-या अधिका-याचे नांव, पदनाम व विभाग.

२] विदेश दौ-याचे ठिकाण व दौ-याचा कालावधी

३] [अ] विदेश दौ-यासंबंधीचे/प्रशिक्षणासंबंधीचे आमंत्रण सरळ राज्य शासनाकडे आले आहे काय?

* [ब] राज्य शासनाकडे सरळ आमंत्रण आले असल्यास विभागाच्या/संस्थेच्या नावाने आले आहे की व्यक्तीच्या नावाने आले आहे?

४] [अ] विदेश दौ-याचे/प्रशिक्षणाचे आमंत्रण केंद्र शासनाच्या संबंधित मंत्रालयाकडून आले आहे काय? विदेश दौ-यासंबंधीच्या/प्रशिक्षणासंबंधीच्या विषयाशी संबंधित केंद्र शासनाच्या मंत्रालयाचे नाव काय?

[ब] केंद्र शासनाने राज्य शासनाकडून अधिका-यांच्या नावाची शिफारस मागितली आहे की विशिष्ट अधिका-यांची शिफारस केली आहे?

५] [अ] विदेशी दौ-याचा प्रस्ताव स्वत:हून संबंधित मंत्रालयीन विभागाने शासनाच्या मंजूरीसाठी सादर केला आहे काय?

[ब] दौ-याचे कारण, अभ्यास/प्रशिक्षण, महत्व व उपयोगिता याबाबत सविस्तर विवेचन.

६] विदेशी प्रशिक्षण/दौरा संबंधित अधिकारी हाताळत असलेल्या विषयाशी संबंधित/उपयुक्त आहे किंवा काय? विदेश दौ-याच्या/प्रशिक्षणाच्या विषयाशी उपयुक्त अशी शैक्षणिक अर्हता संबंधित अधिका-यांकडे आहे किंवा काय?

७] ज्या अधिका-यांची विदेश दौ-यासाठी/प्रशिक्षणासाठी शिफारस करण्यात येते त्यांची या पदावर किती सेवा झाली आहे व या पदावर पुढे किती काळ ते राहणार आहेत? विदेश प्रशिक्षणासाठी/दौ-यासाठी किमान सेवेची अट असल्यास ती पूर्ण होते किंवा कसे,

८] विदेश दौ-यासाठी/प्रशिक्षणासाठी वयाची मर्यादा आहे किंवा काय? असल्यास संबंधित अधिकारी वयोमर्यादा पूर्ण करतात किंवा काय?

९] अ] विदेश दौ-याचा/प्रशिक्षणाचा एकूण खर्च,

[ब] खर्च कोण करणार आहे,

[क] सदर खर्च विदेशी संस्था करणार असेल तर संस्थेचा तपशिल.

[ड] राज्य शासन किंवा राज्य शासनाच्या नियंत्रणाखालील मंडळ/महामंडळ खर्च करणार असल्यास त्यासाठी अर्थसंकल्पात तरतूद आहे का?

[९] या खर्चाबाबत सक्षम प्राधिकारी कोण आहेत व त्यांनी खर्चास मंजूरी दिली आहे काय?

१०] विदेश दौ-यावर/प्रशिक्षणासाठी जाणा-या अधिका-यांविरुध्द विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरण चालू आहे किंवा काय?

११] विदेश दौ-यावर/प्रशिक्षणासाठी प्रस्तावित अधिका-यांनी गेल्या पाच वर्षात केलेल्या विदेश दौ-याचा/घेतलेल्या विदेशी प्रशिक्षणाचा तपशिल व कालावधी.

१२] या अधिका-यांचा प्रस्ताव मान्य न झाल्यास पर्यायी कोणते अधिकारी विदेश दौ-यासाठी/प्रशिक्षणासाठी पाठविता येतील?

---

* टिप : या मुद्यांच्या संदर्भात सामान्य प्रशासन विभाग,परिपत्रक क्र. टीआरएन-११९५/प्र. क्र. ६/९५/दहा, दिनांक २०. १. ९५ च्या सूचनांचा विचार करणे अत्यावश्यक आहे.